**सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षाकरीता प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी २२१० जी ८८८ (SCP) या लेखाशिर्षाखाली राज्य हिस्स्यापोटी (४०%) निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रजयो-२०२२/प्र.क्र. १३०/आरोग्य-६**
गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
तारीख: १६ फेब्रुवारी, २०२३

**<u>वाचा</u> -**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९.
२) राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई यांचे क्रमांक: राआहसो /लेखा /प्रअ /१०१३८ /१९१२/२०२२, दिनांक ३०.११.२०२२ चे पत्र.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र.३८ /अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२३.

**<u>प्रस्तावना</u> -**

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेचे महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी संलग्नीकरण करून दोन्ही योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २६.०२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र पुरस्कृत योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०% व राज्य शासनाचा ४०% आर्थिक सहभाग आहे. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सदर योजनेसाठी २२१० जी ८८८ (राज्य हिस्सा ४० टक्के) या लेखाशिर्षाखाली रू. २८.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित आहे. प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या कालावधीकरीता राज्य हिस्स्यापोटी ३१, सहायक अनुदाने या उद्दिष्टाकरिता रु.७,७६,४५,१६८/- (अक्षरी सात कोटी शहात्तर लक्ष पंचेचाळीस हजार एकशे अडुसष्ट फक्त) तसेच दिनांक ०१.०४.२०२२ ते दिनांक ३१ मार्च, २०२३ या कालावधीतील हमी तत्वावरील दावे अदायगीसाठी रु.३५,५१,२६५/- असा एकुण रु.८,११,९६,४३३ (अक्षरी रुपये आठ कोटी एकरा लक्ष शहान्नव हजार चारशे तेहतीस फक्त) एवढा निधी Escrow Account मध्ये वर्ग करण्यासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसाठी राज्य शासनाच्या हिश्यापैकी (४० टक्के) माहे जानेवारी, २०२३ ते माहे मार्च, २०२३ या कालावधीकरीता ३१, सहायक अनुदाने या उद्दिष्टाकरिता रु.७,७६,४५,१६८/- (अक्षरी सात कोटी शहात्तर लक्ष पंचेचाळीस हजार एकशे अडुसष्ट फक्त) तसेच दिनांक ०१.०४.२०२२ ते दिनांक ३१ मार्च, २०२३ या कालावधीतील हमी तत्वावरील दावे अदायगीसाठी रु.३५,५१,२६५/- असा एकुण रु. ८,११,९६,४३३/- (अक्षरी रुपये आठ कोटी एकरा लक्ष शहान्नव हजार चारशे तेहतीस फक्त) इतका सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रकमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सासेसायटीच्या नावे काढण्यात यावा.

२. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) शासनाने विहीत केलेल्या विमा दराने सदरचा निधी हा एकत्रित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांच्या विमाहप्त्यापोटी विमा कंपनीस/ हमी तत्त्वावरील दाव्यांची रक्कम संबंधित रुग्णालयास प्रदान करण्यात यावा.

२) सदरचा निधी विमा कंपनीस विमाहप्ता अदा केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमून्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

३. सदर निधी आयुष्यमान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना, महाराष्ट्र या खात्यामध्ये जमा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. वित्त विभागाने परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ९ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापुर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यामध्ये (ESCROW Account) जमा करुन खर्च

करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४.०४.२०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य ०१-नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातर्गत योजना, (०१) (०४)-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) २२१० जी ८८८, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या तरतुदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

६. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

७. अनुसूचित जाती उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाच्या दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

८. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र.२३/२०२३/व्यय-१४, दिनांक २०.०१.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१६११४८३७४११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2023.02.16 14:46:21 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.कक्ष अधिकारी (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.